**जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे कार्यालयाच्या नुतनीकरणाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय व वित्तीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः नुतनी-२०२४/प्र.क्र.९३/उद्योग-३**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: १४ जून, २०२४

**वाचा:-**

१) उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१६/प्र.क्र.२१५/उद्योग-४, दि.२४.०८.२०१७
२) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय भाग-२, दि.२०.०९.२०१९
३) उद्योग संचालनालयाचे पत्र क्र.उसं/प्रशासन/जिउकें, ठाणे कार्यालयाचा इमारत छत दुरुस्ती प्रस्ताव /२०२४/अे-३१५, दि.१५.०३.२०२४.

**प्रस्तावना:-**

उद्योग संचालनालयाच्या अधिपत्याखालील जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे हे कार्यालय महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या ठाणे येथील कार्यालयाच्या इमारतीमधील पहिल्या मजल्यावर स्थित आहे. सदर जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाच्या भिंती खराब झाल्यामुळे पावसाळ्यात फार मोठ्या प्रमाणात पाणी गळती होते. पाणी गळतीमुळे शॉर्टसर्कीट होऊन काही अपघात होण्याची शक्यता असल्याबाबत संदर्भाधीन क्र. ३ येथील पत्रान्वये कळविण्यात आले आहे. त्यामुळे सदर कार्यालयाची दुरूस्ती होऊन छतावर शक्य तितक्या लवकर GI शेड बांधणे आवश्यक आहे.

२. उद्योग संचालनालयाने संदर्भ क्र. ३ येथील प्रस्तावान्वये विनंती केल्यानुसार जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाचे A विंग च्या ७०९.०२ Sq.mt. आणि B विंग च्या ९२४.२० sq. mt. अशा एकूण १६३३.२२ sq.mt. इतक्या जागेच्या नुतनीकरणाचे रु.२,७०,४०,२०३/- इतक्या रकमेचे अंदाजपत्रक मुख्य अभियंता (स्थापत्य) आणि (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांच्या तांत्रिक मान्यतेसह शासनाच्या प्रशासकीय मान्यतेस्तव सादर केले आहे. परि.१ येथील बाब विचारात घेता, जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे कार्यालयाच्या नुतनीकरणाच्या खर्चास प्रशासकीय तथा वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय:-**

उद्योग संचालनालयाच्या अधिनस्त जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाच्या महाराष्ट्र औद्योगिक विकास महामंडळाच्या ठाणे येथील इमारतीमधील पहिल्या मजल्यावरील A विंग च्या ७०९.०२ Sq.mt. आणि B विंग च्या ९२४.२० sq.mt. अशा एकूण १६३३.२२ sq.mt. इतक्या जागेच्या अंतर्गत भागाच्या नुतनीकरणाच्या अनुषंगाने सदर कार्यालयातील फर्निचर, रंगकाम,

अग्निरोधक यंत्रणा, विद्युतीकरण, इ. बाबींच्या खर्चास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी दिलेल्या तांत्रिक मान्यतेनुसार रु.२,७०,४०,२०३/- (रुपये दोन कोटी सत्तर लाख चाळीस हजार दोनशे तीन फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय तथा वित्तीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. अंदाज पत्रकात ज्या बाबींसाठी बाजारभावानुसार दर प्रस्तावित केले आहेत या दराबाबत राज्य दरसूची बाह्य बाबींच्या दराकरिता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७.क्र.प्र/११-नियोजन/३.दि ,११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी .

१. प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन संदर्भ क्र. १ येथील या विभागाच्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

२. प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र. इएनव्ही-२०१३/प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

३. स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

४. इमारतीमध्ये दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयींबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

५. विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही. याद्दष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाच्या अंतर्गत भागाच्या नुतनीकरणास मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई यांनी तांत्रिक मान्यता दिल्याप्रमाणे अंदाजपत्रकाचा गोषवारा संक्षिप्त स्वरुपात खालीलप्रमाणे आहे:-

| **Name of the Office: District Industries Centre, Thane** | | |
|---|---|---|
| **Name of Work: Renovation of District Industries Centre, Thane, Maharashtra Industrial Development Corporation Building 1st Floor** | | |
| **RECAPITULATION SHEET** | | |
| **A. Electrical Work Description** | | |
| Sr. No. | Description | Amount |
| 1. | 112111/2023-24 Providing split type Air-Conditioning units to conference hall and cabins of Udyag Bhavan At MIDC office complex Thane | Rs. 16,46,802/- |
| 2 | 112112/2023-24 Providing on Grid Solar PV system for Udyog Bhavan at MIDC office complex Thane | Rs. 23,30,804/- |
| 3 | 112113/2023-24 Providing Renovation to Electrical Installation Of Udyog Bhavan at MIDC office Complex Thane | Rs. 18,55,573/- |
| 4 | 112115/2023-24 Providing Fire alarm system for Udyog Bhavan at MIDC Office Complex, Thane | Rs. 6,97,840/- |

| | | |
|---|---|---|
| **Total** | | **Rs. 65,31,019/-** |
| **B. Architectural Work Description** | | |
| Sr. No. | Description | Amount |
| 1 | Repairs and Renovation of District Industrial Centre at Mulund Check Naka, Thane | Rs. 1,59,85,216.86/- |
| 2 | Royalty Charges | Rs. 10942.76/- |
| 3 | Testing Charges | Rs. 32,790/- |
| | Total | Rs. 1,60,28,949/- |
| 4 | Contingency charges 4% | Rs. 6,41,157.98/- |
| 5 | Centage Charges 5% | Rs. 8,01,447.48/- |
| 6 | Insurance 1 % | Rs. 1,60,289/- |
| 7 | G.S.T. 18 % | Rs. 28,77,339.04/- |
| **Total** | | **Rs. 2,05,09,184.00/-** |
| **GRAND TOTAL** | | **Rs. 2,70,40,203/-** |

३. जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे या कार्यालयाच्या नुतनीकरणासाठी येणारा खर्च मागणी क्र. के-७ (४८५१ १३२४), (१०२) लघुउद्योग (०१) लघु उद्योगासाठी भांडवल अंशदान (०१)(०२) जिल्हा उद्योग भवनाचे बांधकाम व दुरुस्ती कार्यक्रम (४८५१ १३२४) अंतर्गत ५३, मोठी बांधकामे या लेखाशिर्षांतर्गत त्या त्या आर्थिक वर्षातील उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय सदंर्भ क्र. ५ येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग- पाच अंतर्गत महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४(१) अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०६१४११२७२९४८१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SHASHANK TUKARAM CHAVAN

Digitally signed by SHASHANK TUKARAM CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=7dd1791f8c7f2d8cbabbae6c3c11ac3d4fe93ccab49daf36ff24dacd585e2276, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A089DF063F1FFA9C6E2D052DB3C26C5B1ECE40048A4A7D39615BEE66D9E2053D, cn=SHASHANK TUKARAM CHAVAN
Date: 2024.06.14 11:40:56 +05'30'

**( शशांक चव्हाण )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
२. प्रधान सचिव (उद्योग) यांचे स्वीय सहायक, उद्योग, उर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई.

४. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)/ (लेखा व परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

५. सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई.

६. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई.

७. अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे

८. सहसंचालक, विभागीय कार्यालय, ठाणे.

९. महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र, ठाणे.

१०. अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई

११. निवडनस्ती, उद्योग-३